**अल्पसंख्याक समाजाचे शासकीय सेवेतील प्रमाण वाढविण्याकरिता स्पर्धा परिक्षा प्रशिक्षण योजना <u>राबविण्याबाबत.</u>**

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक अविवि-२००९/प्र.क्र.२३४/०९/का-९
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २० मार्च, २०१०

संदर्भ :- शा.नि.साप्रवि क्र. आरएमएन-२००४/४०५/प्र.क्र.३३ (दोन)/ ०४/३५, दि. २ नोव्हेंबर, २००४.

**<u>प्रस्तावना :-</u>**

अल्पसंख्याक समाजाचे राज्यसेवा, केंद्रीय सेवा व अखिल भारतीय सेवेतील प्रमाण वाढावे याकरिता मा. पंतप्रधानाच्या अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठीच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमामध्ये अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांना स्पर्धा परीक्षा पूर्व प्रशिक्षण देण्याची उपाययोजना सुचविली आहे. अशा प्रशिक्षणाची गरज सच्चर समितीच्या अहवालातही नमूद करण्यात आली आहे.

राज्य अल्पसंख्याक आयोगामार्फत खाजगी प्रशिक्षण संस्थाच्या माध्यमातून अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी स्पर्धा परीक्षा पूर्व प्रशिक्षण योजना राबविण्यात येत आहे. परंतू सदर योजना फारशी यशस्वी झाल्याचे दिसून येत नाही. त्यामुळे अल्पसंख्याक समाजातील निवडक होतकरु उमेदवारांना राज्य प्रशासकीय सेवा प्रशिक्षण संस्थेमार्फत प्रशिक्षण देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक समाजाचे (मुस्लिम, ख्रिश्चन, बौध्द, जैन, शीख व पारशी ) शासकीय सेवांमधील प्रमाण वाढावे याकरिता केंद्रीय लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परिक्षेच्या तयारीसाठी अल्पसंख्याक समाजातील निवडक होतकरु उमेदवारांना राज्य प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेच्या मुंबई/कोल्हापूर/नागपूर/औरंगाबाद येथील प्रशासकीय प्रशिक्षण केंद्रांमध्ये प्रशिक्षण देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. राज्य प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेमार्फत स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण योजनेंतर्गत महाराष्ट्र राज्याचे अधिवासी (Domicile of Maharashtra) असलेल्या धार्मिक अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांना केंद्रीय लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणाऱ्या नागरी सेवा स्पर्धा परीक्षांच्या तयारीसाठी राज्य प्रशासकीय सेवा प्रशिक्षण संस्थेच्या मुंबई, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद येथील प्रशासकीय प्रशिक्षण केंद्रामध्ये प्रशिक्षण देण्यात येईल.

**२) योजनेच्या अटी व शर्ती :-** या योजनेचा लाभ घेण्यासाठी इच्छुक उमेदवारांनी खालील अटी व शर्तीची पूर्तता करणे आवश्यक राहील :-

१) उमेदवाराने कोणत्याही मान्यताप्राप्त विद्यापीठातून किमान पदवी परिक्षा उत्तीर्ण केलेली असावी.

२) उमेदवार धार्मिक अल्पसंख्याक समाजातील असावा.

३) महाराष्ट्र राज्याचा अधिवासी (Domicile of Maharashtra) असावा.

४) उमेदवारांकडे केंद्रीय लोकसेवा आयोगामार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या नागरी सेवा परिक्षांसाठी विहित केलेल्या इतर सर्व अर्हता असाव्यात.

५) प्रशिक्षण कार्यक्रम सुरु होण्यापूर्वी केंद्रीय लोकसेवा आयोगामार्फत संबंधित परिक्षेकरिता जाहिरात प्रसिध्द झाली असल्यास प्रशिक्षण वर्गात प्रवेश देताना संबंधित प्रवेशार्थींनी त्या त्या परिक्षेकरिता आवेदनपत्र सादर करणे आवश्यक आहे.

६) राज्य प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेमध्ये प्रशिक्षणाकरिता प्रवेशासाठी विहित करण्यात आलेल्या नियमांच्या अटी व शर्तीची पूर्तता उमेदवाराने करणे आवश्यक आहे.

**३) प्रशिक्षणार्थ्यांची निवड, प्रवेशासाठी समुदाय निहाय आरक्षण व इतर अटी :-**

अ) सन २०१० या वर्षाकरिता राज्यातील प्रशासकीय सेवा प्रशिक्षण केंद्रात प्रवेशाकरिता प्राप्त झालेल्या अर्जानुसार घेण्यात आलेल्या चाचणी परीक्षेमध्ये उत्तीर्ण झालेल्या व प्रतिक्षायादीत समाविष्ट असलेल्या परंतू अंतिम यादीत निवड न झालेल्या अधिक अल्पसंख्याक प्रशिक्षणार्थीपैकी मुंबई, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद येथील प्रशासकीय प्रशिक्षण केंद्रामध्ये प्रत्येकी १० प्रशिक्षणार्थींना गुणवत्तेनुसार प्रवेश देण्यात येईल.

ब) प्रत्येक केंद्रांच्या प्रवेश क्षमतेपैकी अल्पसंख्याक समुदाय निहाय आरक्षण मुस्लिम-५०%, ख्रिश्चन-१०%, बौध्द-१०%, जैन-१०%, पारसी- १०%, व शीख- १०% असे राहील. एखादया समाज घटकामधील उमेदवार उपलब्ध न झाल्यास त्याऐवजी अन्य समाजघटकातील उमेदवारास गुणवत्तेनुसार प्रवेश देण्यात येईल.

क) प्रशिक्षणार्थींना दरमहा रु. १०००/- याप्रमाणे विदयावेतन देण्यात येईल.

ड) राज्य प्रशासकीय प्रशिक्षण केंद्रामध्ये प्रशिक्षणर्थीसाठी वस्तीगृहाची सोय अपुरी असल्याने सद्यस्थितीत प्रशिक्षणार्थींना त्यांच्या निवासाची सोय स्वतः करावी लागेल.

इ) सदर अधिकच्या अल्पसंख्याक प्रशिक्षणार्थीकरिता होणारा पूर्ण खर्च अल्पसंख्याक विकास विभागामार्फत केला जाईल व त्याकरीता लागणारा निधी उच्च व तंत्रशिक्षण विभागास उपलब्ध करुन दिला जाईल.

३. राज्य प्रशासकीय सेवा प्रशिक्षण संस्थेच्या मुंबई, कोल्हापूर, नागपूर, व औरंगाबाद या केंद्रामार्फत प्रत्येकी दहा अल्पसंख्याक उमेदवारांना वर्ष २००९-१० मध्ये प्रशिक्षण देण्यासाठी येणाऱ्या एकूण रु. ५.०० लाख (पाच लाख मात्र) एवढया खर्चास मान्यता देण्यात येत असून सदर खर्च मागणी क्र. २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण 'मागणी क्र.झेडई-१ (०१)(१७) राज्य अल्पसंख्याक आयोग(२२३५अे २५८) या लेखाशीर्षाखली सन २००९-१० वित्तिय वर्षाकरिता उपलब्ध अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या सहमतीने, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपाचरिक संदर्भ क्र. १४२/व्यय-४ दि. ६.३.२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३१७१४३४४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(उ.सं.दांडेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुक्षेयता) मुंबई/नागपूर.
प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुक्षेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा परिक्षा)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
मा. मंत्री, अल्पसंख्याक विकास, यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास, यांचे खाजगी सचिव.
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व मा. वि.स.स. /वि.प.स. (संसदीय कार्य विभागामार्फत).
सर्व प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व प्रबंधक, विद्यापीठे.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग.
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग.
संचालक, राज्य प्रशासकीय सेवा प्रशिक्षण संस्था, हजारीमल सोमाणी मार्ग, सी.एस.टी. स्थानकासमोर,मुंबई ४०० ००१ ( ५ प्रती).
उपसचिव/ सह सचिव, वित्त विभाग/व्यय-४, अर्थोपाय, मंत्रालय.
उप सचिव, नियोजन विभाग/ का- १४११, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, (मशि-२) मंत्रालय, मुंबई.